जागतिक कृषि गणना या योजनेसाठी सन २०१७-१८ या वर्षातील अखर्चित राहीलेली रु.७.३५ लाख इतकी रक्कम सन २०१८-१९ या वर्षामध्ये वितरीत करणेबाबत..

# महाराष्ट्र शासन

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- कृगयो-२०१८/प्र.क्र.९४/११-अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०७ जुलै, २०१८.

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. पदसातत्य-२०१७/प्र.क्र.२५/११-अे, दि.१३.३.२०१८.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ -३, दि.०२.४.२०१८.
३) भारत सरकार, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग, कृषि गणना प्रभाग यांचे पत्र क्र.-११०१४-१/२०१८-ACU, दि.०८.०५.२०१८.
४) उप आयुक्त (कृषि गणना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.कृआ/१८-१७/कृग/निधी/प्र.क्र.२/२०२/२०१८, दि.०९.०५.२०१८.

<u>प्रस्तावना</u> :-

जागतिक कृषि गणना या १०० % केंद्र पुरस्कृत योजनेकरिता केंद्र शासनाने सन २०१७-१८ या वर्षामध्ये उपलब्ध करुन दिलेल्या रु.१४९.४९ लाख रकमेपैकी रु.१४२.१४ लाख इतका निधी खर्ची पडला व रु.७.३५ लाख इतका निधी अखर्चित राहीलेला आहे. सदर अखर्चित निधी सन २०१८-१९ या वर्षामध्ये पुनिर्जिवित करुन वापरण्यास केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भ क्र. ३ च्या पत्रान्वये मान्यता दिली असल्याने प्रस्तुतचा निधी वितरीत करण्याची विनंती कृषि आयुक्तालयाने संदर्भ क्र. ४ च्या पत्रान्वये केलेली आहे. त्यानुषंगाने सन २०१७-१८ या वर्षातील अखर्चित राहीलेला रु.७.३५ लाख इतका निधी सन २०१८-१९ या वर्षामध्ये खर्च करण्यासाठी, मासिक निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u> :-

जागतिक कृषि गणना या १०० % केंद्र पुरस्कृत योजनेकरिता केंद्र शासनाने सन २०१७-१८ या वर्षामध्ये उपलब्ध करुन दिलेल्या रु.१४९.४९ लाख रकमेपैकी रु. १४२.१४ लाख इतका निधी खर्ची पडला व रु.७.३५ लाख इतका निधी अखर्चित राहीलेला आहे. सदर अखर्चित निधी सन २०१८-१९ या वर्षामध्ये पुनिर्जिवित करुन वापरण्यास केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेनुसार, तसेच, कृषि आयुक्तालयाने केलेल्या विनंतीनुसार सन २०१७-१८ मधील रु.७.३५ लाख इतका निधी सन २०१८-१९ मध्ये खालीलप्रमाणे वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**(रु .लाख)**

| **अ.क्र.** | **बाब** | **निधी (रु.लाखात)** |
|---|---|---|
| १ | ०१- वेतन | १.९७ |
| २ | ११-प्रवास भत्ता | ०.२६ |
| ३ | १३- कार्यालयीन खर्च | ०.९३ |
| ४ | ५०-इतर खर्च | ०.२८ |
| ५ | १६- प्रकाशने | ३.९१ |
| | **एकुण** | **७.३५** |

२. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा : -

"मागणी क्रमांक डी-३,
२४०१, पीक संवर्धन,
१११, कृषि अर्थशास्त्र व सांख्यिकी,
केंद्र पुरस्कृत योजना
(००) (१०) जागतिक कृषि गणना- (१०० टक्के केंद्र पुरस्कृत) (२४०१ ०९९६)"

३. प्रस्तुत प्रयोजनार्थ सहाय्यक संचालक लेखा - १, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी, तर, संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाने त्यांच्या अनुक्रमे अनौपचारीक संदर्भ क्र. अनौसं-३३७/अर्थोपाय, दि.२६.०६.२०१८, तसेच, अनौसं १८५/अर्थ-१३/१८, दि.२९.०६.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८०७०७१६०३४३९६०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2018.07.07 16:05:06 +05'30'

**(उमेश चांदिवडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति -**

१. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-०३२.

२. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
३. उप-आयुक्त (कृषिगणना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५.
४. सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५.
५. सहाय्यक संचालक (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५.
६. महालेखापाल, (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
७. संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२ .
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
९. वित्त विभाग (व्यय-१) / (अर्थसंकल्प-१३) / (अर्थोपाय ), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११ उप सचिव (११-अे / २-अे) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-०३२.
१२ कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१३. निवडनस्ती, का - ११-अे.